हिंदुस्थान



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०१) कल्याणवृष्टीस्तव-१

कल्याणवृष्टिभिरिवामृतपूरिताभिः
लक्ष्मीस्वयंवरण मंगलदीपिकाभिः ।
सवाभिरम्ब तव पादसरजमूल
नाकारि किं मनसि भाग्यवतां जनानाम् ।। १ ।।

आई जगदंबेच्या या नितांतसुंदर स्तोत्राचा पहिल्या चरणात आलेल्या कल्याणवृष्टी या पहिल्याच शब्दाच्या आधारे या संपूर्ण स्तोत्रालाच कल्याणवृष्टिस्तव या नावाने ओळखले जाते.

आई जगदंबे की दृष्टी सकल कल्याणाचे अधिष्ठान आहे, हे सांगताना आचार्य श्री म्हणतात,

कल्याणवृष्टिभिरिवामृतपूरिताभिः- आई सकल कल्याणाची वृष्टी करणारी तुझी ही दृष्टी अमृताने भरलेली आहे.अर्थात ज्याच्यावर हा दृष्टिपात होतो त्याला अमृत प्राप्त होते. अमृत स्वर्गात असते. म्हणजे जणूकाही त्या साधकाला या जगातच स्वर्गीय आनंद प्राप्त होतो.

लक्ष्मीस्वयंवरण- आईच्या दृष्टीचे वैभव म्हणजे ती ज्याच्यावर पडते त्याच्याकडे लक्ष्मी स्वतःच धावत येते. जगात बाकी सगळ्यांना लक्ष्मीच्या प्राप्तीसाठी अथक प्रयत्न करावे लागतात. मात्र आई जगदंबेच्या कृपा पात्र साधकाला या जगातील सर्व सुखे आपोआप बसल्याजागी मिळतात. हे आचार्य कथन किती सुंदर आहे?

मंगलदीपिकाभिः- आईची दृष्टी मंगलाची दीपिका आहे. दीप प्रत्येक गोष्टीला प्रकाशित करतो. तो नसला तर समोर असलेली गोष्ट ही अंधारात दिसत नाही. तो असला की सर्वत्र लख्ख दिसू लागते. तशी आईची कृपादृष्टी प्राप्त झाली की सर्वत्र मंगलच मंगल दिसू लागते. अमंगलाचा अंधार दूर होतो.

सवाभिरम्ब तव पादसरजमूल- हे आई जगदंबे एकदा तुझ्या चरणकमलांची सेवा करण्याला सुरुवात केली की मग त्या सेवेने,

नाकारि किं मनसि भाग्यवतां जनानाम्- त्या भाग्यवान जणांच्या मनामध्ये असलेले काय होत नाही? अर्थात त्यांच्या मनात जे जे येईल ते पूर्ण सफलच होते.

अशी आईची सेवा करणाऱ्या साधकाला आचार्य भाग्यवंत म्हणत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०२) कल्याणवृष्टिस्तव-२

एतावदेव जननि स्पृहणीयमास्त
त्वद्वन्दनषु सलिलस्थगित च नत्र ।
सान्निद्ध्यमुद्यदरुणायुतसदरस्य
त्वद्विग्रहस्य परया सुधयाप्लुतस्य ।। २ ।।

अत्युत्तम साधकाची मानसिक अवस्था कशी असते? याचे नेमके वर्णन करताना आचार्यश्री या श्लोकात म्हणतात,

एतावदेव जननि स्पृहणीयमास्त- हे आई माझी एवढीच स्पृहा म्हणजे इच्छा आहे. कोणती ते सांगताना आचार्यश्री म्हणतात,

त्वद्वन्दनषु - तुझ्या वंदन समयी, अर्थात नमस्कार करीत असताना, सलिलस्थगित च नत्र- डोळ्यात येणाऱ्या अश्रूंनी माझे नेत्र स्थगित होतील, अर्थात यामुळे मला दिसणे बंद होईल.

ज्यावेळी असा साधक आईची चरण वंदना करण्यासाठी वाकेल त्यावेळी डोळ्यात आलेल्या आनंदाश्रूंनी त्याला ती चरणकमले देखील दिसणार नाहीत. त्यावेळी त्याची प्रार्थना आहे की,

उद्यत् - उगवणाऱ्या

अरुण- सूर्य सारथी, प्रभातीचा लालिमा.

अयुत- कोट्यावधी

सदरस्य- समान.

अर्थात प्रभाती पसरलेल्या अरुणोदय कालीन लालिम्याच्या कोट्यावधी पट अधिक तेजस्वी असलेल्या,

परया सुधयाप्लुतस्य- परम म्हणजे श्रेष्ठ सुधा म्हणजे अमृताने अर्थात आनंदाने प्लुत म्हणजे परिपूर्ण भरलेल्या.

त्वद्विग्रहस्य सान्निध्यम् - तुझ्या विग्रह म्हणजे स्वरूपाचे, सान्निध्य म्हणजे जवळीक, मला प्राप्त होवो.

अर्थात ज्या वेळी मी वंदन करेल आणि माझ्या डोळ्यातील अश्रूंनी तुझी चरणकमले मला दिसणार नाही, त्यावेळी हे आई जगदंबे ! मला दिसत नसले तरी, तुझ्या शिवाय मला कोणीही नाही हे, तुला दिसत असल्याने तू दूर जाऊ नकोस.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०३) कल्याणवृष्टिस्तव -३

ईशत्वनामकलुषाः कति वा न सन्ति
ब्रह्मादयः प्रतिभवं प्रलयाभिभूताः ।
एकः स एव जननि स्थिरसिद्धिरास्त
यः पादयस्तव सकृत्प्रणतिं करति ।। ३ ।।

आई जगदंबेचे वैभव सांगतांना आचार्य श्री येथे एका वेगळ्याच गोष्टीचा उपयोग करीत आहेत. आरंभीच्या दोन चरणात ते म्हणतात,

ईशत्वनामकलुषाः कति वा न सन्ति
ब्रह्मादयः प्रतिभवं प्रलयाभिभूताः-

इथे प्रत्येक शब्दाचा वेगळा अर्थ पाहण्यापेक्षा या सगळ्याचा एकत्रित भावार्थ पाहणे अधिक महत्त्वाचे आहे.

कृत-त्रेता -द्वापार- कली ही चार युगे एक हजार वेळा झाली की ब्रह्मदेवाचा एक दिवस अर्थात एक कल्प होतो. असे भगवान ब्रह्मदेवांचे आयुर्मान शंभर वर्ष असते.

ब्रह्मदेव इत्यादिक सर्व देवता, अशा कालगणनेच्या आरंभी निर्माण होतात आणि त्या काल मर्यादेनंतर त्यांचाही लय होतो.

अर्थात या सगळ्यांना उत्पत्ती आणि नाश आहे त्यामुळे आचार्य त्यांना ईशत्वनामकलुष अर्थात नावापुरतेच ईश्वर, शाश्वत नसलेले, असे म्हणत आहेत.

कति वा न सन्ति- अर्थात् कितीतरी आहेतच ना? असे म्हणत, अशा स्वरूपात स्वतःला ईश्वर म्हणणारे ब्रह्मदेवां सारखे कितीतरी देव आहेतच ना? असे आचार्य म्हणताहेत.

अर्थात अशा कितीतरी देवता या परमसत्य, चिरंतन नाहीत हे सांगून ते म्हणतात,

एकः स एव जननि स्थिरसिद्धिरास्त- हे आई या जगामध्ये कायम सिद्धी संपन्न तो एकच आहे,

यः पादयस्तव सकृत्प्रणतिं करति- ज्याने एकदा तुझ्या चरणी वंदन केले आहे.

अर्थात बाकी देवता शाश्वत नसल्याने त्यांच्याद्वारे मिळणारी वरदाने देखील तशीच अशाश्वत आहेत. आई फक्त तुझ्या चरणाशी आला तोच शाश्वत सुख प्राप्त करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०४) कल्याणवृष्टिस्तव- ४

लब्ध्वा सकृत् त्रिपुरसुन्दरि तावकीनं
कारुण्यकन्दलित कान्तिभरं कटाक्षम् ।
कन्दर्पकटिसुभगास्त्वयि भक्तिभाजः
सम्मोहयन्ति तरुणीर्भुवनत्रयऽपि ।। ४ ।।

खरी बुद्धिमत्ता ती जी इतरांना बुद्धी संपन्न करते. खरे वैभव ते जे इतरांना वैभवसंपन्न करते. त्याच प्रमाणे खरे सौंदर्य तेच की ज्याच्या संपर्काने इतरांना सौंदर्य प्राप्त होते. आई जगदंबेचे सौंदर्य तसेच आहे. तिच्या नेत्र कटाक्षांचे हे आगळे वैभव सांगताना, पूज्यपाद आचार्य श्री म्हणतात,

लब्ध्वा सकृत् त्रिपुरसुन्दरि तावकीनं-
त्रिपुरसुन्दरि- हे त्रिभुवनसुंदरी !
तावकीनं- तुझी
लब्ध्वा- प्राप्त करून
सकृत्- एकदाच, सहजपणे.

कारुण्यकन्दलित- कारुण्याने परिपूर्ण भरलेली, कारुण्य ओसंडून वाहत असलेली,

कान्तिभरं -तेज:पुंज कटाक्षम् - नेत्र कटाक्ष.

अशाप्रकारची आई जगदंबेची दृष्टी प्राप्त झाल्यावर होणारा अद्वितीय लाभ आचार्यश्री सांगत आहेत. त्या दृष्टीचे सौंदर्य सांगताना ते म्हणतात,

कन्दर्पकटिसुभगा- कंदर्प म्हणजे मदन. सौंदर्याचे आपल्यासमोर असलेले सगळ्यात मोठे परिमाण. त्याच्या कोट्यावधी पट सुंदर अशी ती, कन्दर्पकटिसुभगा.

त्वयि भक्तिभाज:- तुझ्या भक्तीला पात्र असणारी.
तरुणी- अन्य समस्त सुंदरी.
सम्मोहयन्ति- मोहित करतात.
भुवनत्रयऽपि- तीनही लोकांना.

अर्थात आई जगदंबेच्या वर वर्णन केलेल्या गुणांनी युक्त असलेली कृपादृष्टी प्राप्त झाल्याने त्या सौंदर्याने क्षमता प्राप्त झालेल्या स्वर्गीच्या रंभा, तिलोत्तमा, उर्वशी, मेनका इत्यादी अप्सरा संपूर्ण त्रिभुवनाला मोहित करतात. त्यांच्या नजरेतील ती मोहन शक्ती मूलतः आदिशक्तीची आहे. तिच्या भक्तीने इतरांना ती शक्ती प्राप्त होते हे आईचे खरे वैभव आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०५) कल्याणवृष्टिस्तव-५

ह्रींकारमव तव नाम गृणन्ति वदाः
मातस्त्रिकणनिलय त्रिपुर त्रिनत्र ।
त्वत्संस्मृतौ यमभटाभिभवं विहाय
दीव्यन्ति नन्दनवन सह लकपालैः ।। ५ ।।

कोणत्याही देवतेच्या उपासनेत तंत्र, मंत्र आणि यंत्र अशा तीन गोष्टी असतात. त्या उपासनेचे जे शास्त्रशुद्ध नियम, पद्धती, परंपरा त्यांना तंत्र असे म्हणतात.

या देवतेचे निर्गुण-निराकार स्वरूप ज्याच्या चिंतन-मननातून व्यवस्थित समजून घेता येते त्याला मंत्र असे म्हणतात.

तर त्या देवतेच्या अधिष्ठान स्वरूपात ज्या आकृती तयार केलेल्या असतात, त्यांना यंत्र असे म्हणतात.

आई जगदंबेच्या उपासनेत सर्व श्रेष्ठ यंत्र म्हणजे श्री यंत्र. त्यात सगळ्यात मध्यभागी असतो एक त्रिकोण. त्या त्रिकोणात असणारा जो बिंदू ते  आदिशक्तीचे मूळ पीठ.

कोणत्याही देवतेच्या मंत्रात सर्वाधिक प्रभावशाली मंत्र म्हणजे बीजमंत्र. आई जगदंबेच्या महाकाली, महालक्ष्मी आणि महासरस्वती या तीन स्वरूपां करिता अनुक्रमे ऐं, ह्रीं आणि क्लीं  हे बीजमंत्र शास्त्राने सांगितले आहेत. येथे आचार्य श्री त्या यंत्र आणि बीजमंत्राचा विचार मांडत आहेत. ते म्हणतात,

ह्रींकारमव तव नाम गृणन्ति वदाः- हे आई जगदंबे वेद तुझे नाव म्हणून ह्रीं काराचेच कथन करतात. अर्थात तेच तुझे नाव आहे. तोच तुझा सर्वोच्च मंत्र आहे.

मातस्त्रिकणनिलय- हे आई श्री यंत्राच्या मध्यभागी असणारा त्रिकोण हे तुझे निवासस्थान आहे.

त्रिपुर- हे त्रि-कोण जणूकाही त्रि-पूर आहेत. अर्थात स्थूल, सूक्ष्म ,कारण आहेत. तू त्यांच्या आत राहून त्यांचे संचालन करणारी चैतन्य शक्ती आहेस.

त्रिनत्र - महाकाली महालक्ष्मी आणि महासरस्वती या तीन स्वरूपातील तीन गुणांनी काम करणे हे जणू तुझे तीन नेत्र आहेत.

त्वत्संस्मृतौ यमभटाभिभवं विहाय
दीव्यन्ति नन्दनवन सह लकपालैः - अशा तुझ्या स्वरूपाचे स्मरण करतात, ते यमाचे भट अर्थात दूतांचे भय सोडून नंदनवनामध्ये लोकपाल अर्थात देवतांसह विहार करतात.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०६) कल्याणवृष्टिस्तव -६

हन्तुः पुरामधिगलं परिपीयमानः
क्रूरः कथं न भविता गरलस्य वगः ।
नाश्वासनाय यदि मातरिदं तवार्धं
देहस्य शश्वदमृताप्लुतशीतलस्य ।। ६ ।।

आई भगवतीच्या साहचर्याचा अद्भुत वैभवशाली परिणाम सांगताना आचार्यश्री समुद्रमंथन प्रसंगाचा संदर्भ घेतात.

अमृताच्या प्राप्तीसाठी झालेल्या या समुद्रमंथनात त्या मेरू पर्वताच्या भोवती गुंडाळलेल्या वासुकी सर्पाने ती पीडा सहन न झाल्याने भयानक गरळ ओकले.

जोपर्यंत हे कोणी घेणार नाही तोपर्यंत दुसरे काहीही निर्माण होणार नाही अशी आकाशवाणी झाली. त्यामुळे सर्व देवांनी प्रार्थना केल्यावर भगवान शंकरांनी ते विषप्राशन केले. वास्तविक त्याने त्यांचा विनाश झाला असता. पण !

या पण चे निरूपण करताना आचार्य श्री म्हणतात,

हन्तुः पुरामधिगलं परिपीयमानः
क्रूरः कथं न भविता गरलस्य वगः- पूर्वी ज्यावेळी भगवान शंकरांनी समुद्रमंथनात निर्माण झालेले हालाहल नावाचे विषप्राशन केले त्यावेळी त्या भयानक विषाचा आवेग त्यांना का मारू शकला नाही?

आरंभीच्या दोन चरणात असा प्रश्न निर्माण करून पुढील दोन चरणात आचार्यश्री त्याचे उत्तर देतात. ते म्हणतात,

नाश्वासनाय यदि मातरिदं तवार्धं
देहस्य शश्वदमृताप्लुतशीतलस्य - हे आई जगदंबे ! कायम अमृताने भरलेल्या तुझ्या शीतल शरीराच्या अर्ध्या अंगाचा आश्वासक संगच नसता
.

भगवान शंकरांचे स्वरुप अर्धनारीनटेश्वर आहे. श्रीशंकर आणि आदिशक्ती अभिन्न आहेत.

भगवान शंकर त्या विषाने संपले नाही कारण त्यांच्यासोबत अमृतमय असलेला आई जगदंबेचा अर्धा देह आहे.

त्या विश्वविनाशक विषाचा परिणाम आईच्या अमृतमय स्पर्शांनी नष्ट झाला.

हे आचार्य श्रींचे कथन कमालीचे मनमोहक आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०७) कल्याणवृष्टिस्तव- ७

सर्वज्ञतां सदसि वाक्पटुतां प्रसूत
दवि त्वदङ्घ्रि सरसीरुहयः प्रणामः ।
किं च स्फुरन्मकुटमुज्ज्वलमातपत्रं
द्व चामर च महतीं वसुधां ददाति ।। ७ ।।

आई जगदंबेची कृपा प्राप्त झाली की कोणकोणते अतिदिव्य लाभ होतात, हे सांगतांना जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

दवि त्वदङ्घ्रि सरसीरुहयः प्रणामः- हे आई जगदंबे तुझ्या अंघ्री म्हणजे चरण, सरसीरूहयो: म्हणजे कमलावर जो कोणी वंदन करतो, त्याला या जगात,

सर्वज्ञतां - सर्व प्रकारच्या विद्या आणि कलांमध्ये अक्षुण्ण गती,

सदसि वाक्पटुतां- सभेमध्ये वाक कौशल्य,

प्रसूत- प्राप्त होते.

यातील सभेतील वाक् कौशल्य हा शब्द महत्त्वाचा आहे. बोलता तर सगळ्यांनाच येते. पण सभेत याचा अर्थ विद्वानांच्यासमोर, शास्त्रशुद्ध, मुद्देसूदरीत्या, अकाट्य तर्कपूर्ण रीतीने बोलता येणे. अशावेळी अनेकांची फक्त त -त ,प -प होते. आई च्या कृपेने माणसाला अशा ठिकाणी वक्तृत्व संपन्नता येते.

किं च- आईच्या कृपेचे आणखीन काय लाभ सांगू? शेवटी सर्व एकत्र करून सांगण्याची माऊलींची 'किंबहुना' शब्द रचनेतील भूमिका या 'किं च' मध्ये आली आहे.

स्फुरन्मकुट- देदीप्यमान मुकुट अर्थात साम्राज्य पद.

उज्ज्वलमातपत्रं- चमचमते छत्र. त्यात उज्ज्वल शब्दात पांढरा रंग अपेक्षित आहे. एकछत्री सम्राटाचे छत्र पांढऱ्या रंगाचे असते.तो भाव.

द्व चामर च - दोन्ही बाजूला चवऱ्या. राजाच्या दोन्हीकडे उभ्या राहून त्याला वारा घालणाऱ्या सेविका, हा सामान्य अर्थ. हा कोणत्याही लहानसहान राजाला लागू पडतो.

येथे जणू सूर्य आणि चंद्र याच दोन चवऱ्या आहेत महान अर्थ अपेक्षित आहे.

महतीं वसुधां - विशाल पृथ्वी. अर्थात समुद्र वलयांकित साम्राज्य.

ददाति- आईची कृपा हे सर्व काही प्रदान करते.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०८) कल्याणवृष्टिस्तव-८

कल्पद्रुमैरभिमतप्रतिपादनषु
कारुण्यवारिधिभिरम्ब भवत्कटाक्षैः ।
आलकय त्रिपुरसुन्दरि मामनाथम्
त्वय्यव भक्तिभरितं त्वयि बद्धतृष्णम् ॥ ८ ॥

आई जगदंबेच्या कृपाकटाक्षाचे वैभव सांगतांना भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणत आहेत की दृष्टीनेच या जगात सर्व काही प्राप्त होऊ शकते. आई सर्वकाही देते पण त्यासाठी आपण तिचे भक्त असणे अपेक्षित आहे.

अभिमत- साधकाला, भक्ताला, उपासकाला, जे जे हवे असते ते. मनोवांच्छित

प्रतिपादनषु- प्रदान करण्याच्या बाबतीत,

कल्पद्रुम- कल्पवृक्ष. अशी आई जगदंबेची दृष्टी आहे. अर्थात एकदा ही दृष्टी प्राप्त झाली की भक्ताच्या मनात जे येते ते सर्व प्राप्त होते.

जसा एकच कल्पवृक्ष सर्व काही देतो, तशी आईची एकच कृपा सर्व काही प्रदान करते.

अम्ब भवत्कटाक्ष- हे आई तुझे नेत्र कटाक्ष,

कारुण्यवारिधी- वारी म्हणजे पाणी त्याचा धी म्हणजे साठा.अर्थात समुद्र. आईची दृष्टी म्हणजे कारुण्याचा जणूकाही समुद्र. सागर जसा अथांग असतो , अपार असतो, जसे त्यात केवळ पाणीच पाणी असते, तशी आईची करूणा अथांग, अपार आहे. त्या दृष्टीत कारुण्याशिवाय अन्य काहीच नाही.

आलकय त्रिपुरसुन्दरि मामनाथम्- हे त्रिपुरसुंदरी, अनाथ असलेल्या माझ्याकडे पहा. तू माझ्याकडे पाहिले नाही तर तीच अनाथता.

हे आई माझ्याकडे पहा कारण,

त्वय्यव भक्तिभरितं- मी केवळ तुझ्याच भक्तीने भरलेला आहे. मला अन्य काही समजतच नाही.

त्वयि बद्धतृष्णम्- माझ्या सगळ्या इच्छा तुझा ठिकाणी बांधलेल्या आहेत. मला अन्य कोणाचाही आश्रय नाही. मग मी मागू तरी कोणाला ?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१०९) कल्याणवृष्टिस्तव- ९

हन्ततरष्वपि मनांसि निधाय चान्य
भक्तिं वहन्ति किल पामरदैवतषु ।
त्वामव दवि मनसा समनुस्मरामि
त्वामव नौमि शरणं जननि त्वमव ॥ ९ ॥

आई जगदंबेच्या एकमेवाद्वितीय सर्वश्रेष्ठत्वाला अधोरेखित करताना आचार्य श्री म्हणतात,

हन्त- अरेरे! या अर्थाचा हा उद्गार. कितीही समजावून सांगितले तरी न ऐकणाऱ्या सामान्य दीन जनांकडे पाहून आलेला हा कनवाळू उद्गार आहे.

काय समजावून सांगत होते आचार्य? काय ऐकत नव्हते सामान्य जन? तर,

इतरष्वपि मनांसि निधाय चान्य

भक्तिं वहन्ति किल पामरदैवतषु - हे आई जगदंबे, हे सर्व तुला सोडून इतर सामान्य दैवतांच्या ठाई मन एकवटून उपासना करतात.

यातील पामर देवता हा शब्द मोठा चिंतनीय आहे. अन्य अनेक देवता आपल्यापेक्षा जरी श्रेष्ठ असल्या तरी त्यांना त्यांच्या स्वतःच्या मर्यादा असतात. श्रीअग्नीदेवांना फक्त जाळण्याची शक्ती आहे ते पाणी देऊ शकत नाहीत तर भगवान वरूणांना पाणी देण्याची शक्ती आहे ते काडिपेटी देणार नाहीत.

या अर्थाने या देवतांना पामर असे म्हटले आहे. जर अशा स्वरूपात या देवताच मर्यादित असतील तर त्यांच्याद्वारे मिळणारी वरदाने, कृपा अमर्याद कशा असतील? याच अर्थाने आचार्यश्री वरील कथन करीत आहेत. ते या सर्व देवतांना पामर देवता म्हणताहेत. सामान्य जन अशा दैवतांच्या मागे लागतात.

आई मला मात्र वास्तविकता कळली आहे. माझी परिस्थिती विचारशील तर,

त्वामव दवि मनसा समनुस्मरामि- हे आई मी मनाने फक्त तुझेच स्मरण करतो.

त्वामव नौमि शरणं जननि त्वमव- मी केवळ तुलाच शरण आलो आहे तूच माझी आई आहेस.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

११०) कल्याणवृष्टिस्तव- १०

लक्ष्यषु सत्स्वपि कटाक्षनिरीक्षणानां
आलकय त्रिपुरसुन्दरि मां कदाचित् ।
नूनं मया तु सदृशः करुणैकपात्रं
जात जनिष्यति जन न च जायत वा ।। १० ।।

भक्ताच्या आणि भगवंताचे नाते माता पुत्रासमान असते. इथे तर भगवती आई जगदंबेचाच विषय आहे. त्या पुत्र वात्सल्याचे विविध पैलू आचार्यांच्या विवेचनात प्रकट होत आहेत. आईला अनेक लेकरे असतात. सगळेच तिला प्रिय असतात. पण त्यातही जे लेकरू थोडे दुर्बल असते, असहाय्य असते, हतबल असते, त्यावर आईचे थोडे अधिक लक्ष असते. व्यवहारातील मातेचा हा स्वभावविशेष येथे आधार करीत आचार्य श्री आई जगदंबे ला स्वतःकडे लक्ष द्यायला सांगत आहेत.

आईच्या विश्वजननी स्वरूपाला मान्य करत ते आरंभी म्हणतात,

लक्ष्यषु सत्स्वपि कटाक्षनिरीक्षणानां

आलकय त्रिपुरसुन्दरि मां कदाचित् - आई जगदंबेच्या कृपाकटाक्षाने निरीक्षण करावे असे असंख्य जीव असले तरी ही त्रिपुरसुंदरी माझ्याकडे कदाचित पाहील.

अर्थात तिच्या कृपेला पात्र जगात असंख्य लोक आहेत. त्या सगळ्यांच्या तुलनेत मी अत्यंत सामान्य आहे. त्यामुळे पहिल्या आवेगात माझ्याकडे लक्ष जाणार नाही हे ठीक आहे. पण तरी ती त्रिपुरसुंदरी माझ्याकडे पाहील.

हा एक तर माझा विश्वास आहे आणि दुसरा माझा नाईलाज.

विश्वास यासाठी की ती जगज्जननी आहे तर मग माझा अव्हेर कसा करेल? आणि नाईलाज यासाठी की तिच्या शिवाय मला आहे तरी कोण?

आई जशी हतबल लेकराकडे अधिक पाहते तशी ती माझ्याकडे पाहणारच. कारण,

नूनं - खरोखरच

मया तु सदृशः- माझ्या समान.

करुणैकपात्रं- करूणेला पूर्णपणे पात्र.

जात जनिष्यति जन न च जायत वा - आजवर कोणी जन्माला आला नसेल किंवा कदाचित भविष्यात जन्माला येणार ही नाही.

मग माझी आई ! तुला माझ्याकडे दुर्लक्ष करून कसे चालेल?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१११) कल्याणवृष्टिस्तव-११

हीं हीमिति प्रतिदिनं जपतां तवाख्यां
किं नाम दुर्लभमिह त्रिपुराधिवास ।
मालाकिरीटमदवारणमाननीया
तान् सवत वसुमती स्वयमव लक्ष्मीः ।। ११ ।।

आई जगदंबेच्या कृपा प्रसादाचे वैभव सांगतांना आचार्य श्री पुढे म्हणतात,

हीं हीमिति - हीं, हीं अशा स्वरूपात,

प्रतिदिनं - नित्यनियमाने, अनवरत.

जपतां तवाख्यां- तुझे नाव जपले असताना.

अर्थात ही आई जगदंबे जो रोज तुझ्या नावाचा असा जप करतो त्याला. यातील प्रतिदिन हा शब्द फार महत्त्वाचा आहे.

सामान्यतः लोक भगवंताचे नाव त्याच वेळी घेतात ज्या वेळी त्यांच्यावर काहीतरी संकट येते. अशा तात्कालिक भक्तांना भगवान पावत नाही असे नाही. पण त्याचे आवडते भक्त तेच असतात जे प्रतिदिन भजन करतात. संकटाचा मागमूस नसतानादेखील भगवंताचे नामस्मरण करतात.

अशा भक्तांचे भाग्य सांगताना आचार्य म्हणतात,

किं नाम दुर्लभमिह त्रिपुराधिवास- हे त्रिपुराधिवासिनी ! तुझ्या अशा भक्तांना या जगात दुर्लभ असे काय आहे? अर्थात त्यांना सर्व काही सहजतेने प्राप्त होते.

काय काय प्राप्त होते? याची एक झलक दाखवताना आचार्य श्री म्हणतात,

माला- मोत्यांच्या माळा, अर्थात सर्व प्रकारची रत्ने,

किरीट- मुकुट अर्थात साम्राज्य.

मदवारण- मदोमत्त हत्ती. संपत्तीचे हे सगळ्यात मोठे प्रतीक वर्णिले आहे. दारात झुलणारा असा हत्ती अफाट श्रीमंतालाच परवडू शकतो.

माननीया- या सगळ्याने सन्मानित झालेली,

तान् सवत वसुमती स्वयमव लक्ष्मीः- अशी देवी लक्ष्मी त्यांना स्वतःहून प्राप्त होते.

वर वर्णन केलेले सर्व वैभव देवी लक्ष्मीचे असले तरी अशी लक्ष्मी मिळाली की हे सर्व त्याला आपोआपच मिळते.

दुसरी फार महत्त्वाची गोष्ट म्हणजे अशी देवी लक्ष्मी म्हणजे वैभव त्याला स्वतःहून प्राप्त होते. त्यासाठी तो काहीही प्रयत्न करीत नाही.

भक्त केवळ आई जगदंबेची उपासना करतो. त्याला या सर्व गोष्टी आई स्वतःहून देते. हे आचार्य कथन मोठे मर्म पूर्ण आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१११२) कल्याणवृष्टिस्तव-१२

संपत्कराणि सकलन्द्रियनन्दनानि
साम्राज्यदाननिरतानि सररुहाक्षि ।
त्वद्वन्दनानि दुरिताहरणद्यतानि
मामव मातरनिशं कलयन्तु नान्यम् ।। १२ ।।

मान्ये- हे सगळ्यांना मान्य अर्थात वंदनीय असणाऱ्या आई जगदंबे! सर्वसामान्य मानवच नव्हे तर ईश्वर महेश्वर देखील जिच्या योग्यतेचा सन्मान करतात अशी.

सरोरूहाक्षि- हे कमलनयने. सर म्हणजे तलाव. त्यात उरुह म्हणजे जन्माला येऊन वर येणारे. अर्थात कमळ. तसे जिचे अक्ष म्हणजे डोळे आहेत अशी.

येथे केवळ आकाराच नव्हे तर गुणांचाही विचार आहे. ते कमळ जसे भुंग्यांना आकर्षित करते तशी जिची कृपादृष्टी साधकांना आकर्षित करते, अशी.

त्वद्वंदनानि- तुला केलेली वंदने अर्थात नमस्कार, प्रार्थना.

कशासाठी करायची ही प्रार्थना ? तरीही प्रार्थना अलौकिक फलदायी आहे. ही प्रार्थना काय काय देते ? याचे वर्णन करताना पूज्यपाद आचार्य श्री म्हणतात,

सम्पत्कराणि- सकल संपत्तीला उपलब्ध करून देणारी. जिच्या कृपेने बाह्य जगतातील धनसंपत्ती आणि अंतर्मनातील शम,दम इत्यादी षट् संपत्ती, साधकांना प्राप्त होते अशी.

सकलेन्द्रिय नन्दनानि- सकल इंद्रियांना आनंद देणारी. बाह्य जगतातील पंचकर्मेंद्रिये, पंचज्ञानेंद्रिय आणि अंतर्गत इंद्रिय मन अशा अकराही इंद्रियांना आनंद देणारी.

शब्द, स्पर्श इ. पाचही पद्धतीने प्राप्त होणारे सर्व आनंद प्रदान करणारी. त्या आनंदाला साधनीभूत होणारी साधने प्रदान करणारी.

साम्राज्यदान विभवानि- आपल्या भक्तांना साम्राज्य दान देण्याचे वैभव असणारी.

दुरिताहरणोद्यतानि- दुरित अर्थात पाप, वाईट ,अमंगल. त्याचे हरण करण्यास म्हणजे नष्ट करण्यास उद्यत म्हणजे कायम सिद्ध असणारी.

अशी ही आईची वंदना,

मामेव- माझ्यावरच, मलाच.

मातरनिशं - हे माते अनिश अर्थात सतत.

कलयन्तु- प्राप्त होत राहो.

अर्थात अशा सर्व अद्वितीय गुणांनी युक्त असणारी ही वंदना सतत करण्याची शक्ती मला प्राप्त होवो.

नान्यम् - मला अन्य काहीही नको.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**११४)** कल्याणवृष्टिस्तव- १४

लग्नं सदा भवतु मातरिदं तवार्धं
तजः परं बहुलकुङ्कुमपङ्कशणम् ।
भास्वत्किरीटममृतांशुकलावतंसं
मध्य त्रिकणनिलयं परमामृतार्द्रम् ।। १४ ।।

विश्व प्रलयाच्या वेळी भगवान श्री महाकालांना सोबत करीत असणाऱ्या चैतन्यशक्तीच्या स्वरूपाचे वर्णन केल्यावर आचार्य श्री येथे या साहचर्याच्या सातत्याची कामना करीत आहेत.

आई जगदंबेचे साह्य आहे म्हणूनच भगवान शंकर काही कार्य करू शकतात. ती शक्ती दूर झाली तर शिव हे शव आहेत. अमंगल शवाला परममंगल शिव करणारी ही शक्ती. तिचे स्वरूप वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात,

लग्नं सदा भवतु मातरिदं तवार्धं- आई अर्धनारीनटेश्वर स्वरूपातील तुझे हे अर्धे शरीर, भगवान शंकरांशी सदैव लग्न म्हणजे जुळलेले असो. या एकत्रीकरणाचा कधीही वियोग न होवो.

कसे आहे आईचे हे स्वरूप? तर ते म्हणतात,

तजः परं- परम तेजस्वी. बहुलकुङ्कुमपङ्कश- प्रचुर प्रमाणात अर्पण केलेल्या कुंकवाने,

शणम्- लालबुंद दिसणारे. शोण म्हणजे रक्त. पण त्याचा प्राधान्याने विचार आहे गर्भाशयातील रक्ताशी. गर्भाशयाचा संबंध आहे नवनिर्मितीशी. भगवान महाकाल विनाशाची दैवता आहेत. त्यांच्या सोबत असणारी जगदंबा नवनिर्मितीची शक्ती. यातून ते अर्धनारी नटेश्वर स्वरूप परिपूर्ण आहे. केवळ भकास विनाश नव्हे तर नवनिर्मितीसाठी केलेला साफ-सफाई स्वरूप विनाश.

भास्वत्किरीट- तेजस्वी मुकुट धारण केलेले.

अमृतांशुकलावतंसं- अमृत अर्थात शांतता दायक. अंशू म्हणजे किरण. कला म्हणजे भिन्नभिन्न अवस्था. अर्थात चंद्र. त्याला अवतंस म्हणजे मस्तकावर धारण केलेले. मध्य त्रिकणनिलयं- श्री यंत्राच्या त्रिकोणात निवास करणारी. परमामृतार्द्रम्- श्रेष्ठ अशा अमृतमय करूणेने आर्द्र असणारे,

हे तुझे अर्धे अंग कायम भगवंताशी जुळलेले असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

**११५)** कल्याणवृष्टिस्तव-१५

ह्रींकारमव तव नाम तदव रूपं
त्वन्नाम दुर्लभमिह त्रिपुर गृणन्ति ।
त्वत्तजसा परिणतं वियदादिभूतं
सौख्यं तनति सरसीरुहसंभवादः ॥ १५ ॥

जगातील कोणत्याही गोष्टीला जाणून घेण्याचे दोन महत्त्वाचे मार्ग म्हणजे नाम आणि रूप. या दोन्ही गोष्टी परस्परांशी अभिन्नरीत्या संलग्न असतात. एखादी नवीन गोष्ट पाहिली तिचे नाव काय? हा पहिला प्रश्न समोर येतो. तर एखाद्या नवीन गोष्टीबद्दल ऐकले तर ती कशी दिसते? याची उत्सुकता असते.अशा स्वरूपात प्रत्येक गोष्ट नाम आणि रूपाच्या आधारे जाणून घेता येते.

सामान्य गोष्टींच्या बाबतीत यांचे नाम आणि रूप वेगवेगळे असते. मात्र आई जगदंबेचे वैभव सांगताना आचार्यश्री म्हणतात,

ह्रींकारमव तव नाम तदव रूपं- ह्रीं कार हेच तुझे नाव आहे आणि तेच तुझे रूपही आहे. अर्थात या बीज मंत्राने तुला हाक मारता येते म्हणून ते तुझे नाव आहे तर श्री यंत्राच्या सगळ्यात वरच्या त्रिकोणावर हे बीज स्थिर असल्याने ती सर्वोच्चताच भगवतीचे रूप आहे. अर्थात तिचे हे सर्वोच्चत्वच तिचे स्वरूप आहे.

त्वन्नाम दुर्लभमिह त्रिपुर गृणन्ति- याच अर्थाने, हे त्रिपुरसुंदरी ! तुझे नाव दुर्लभ असल्याचे म्हटले जाते. जगातील कोणती भौतिक दृष्ट्या सर्वोच्च गोष्ट देखील सहज प्राप्त नसते मग जगदंबे चे नाव कसे असेल? अनेकांना ते घ्यावेच वाटत नाही हेच त्याचे दुर्लभ स्वरूप आहे.

त्वत्तजसा परिणतं वियदादिभूतं- आई तुझ्याच तेजाने आकाश इ. महाभूते प्रकाशित होत असतात. त्यांना शक्ती प्राप्त होत असते.

सरसीरुहसंभवादः- सरसीरुह म्हणजे कमळामध्ये संभव म्हणजे जन्माला आलेले, श्री ब्रह्मदेव. इत्यादी म्हणजे बाकी सर्व देव.

सौख्यं तनति - सुख प्राप्त करतात.

अर्थात या सगळ्यांना तुझ्याच कृपेने सुख प्राप्त होते.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

११६) कल्याणवृष्टिस्तव-१६ ह्रींकारत्रयसंपुटन महता मन्त्रण संदीपितं

स्तोत्रं यः प्रतिवासरं तव पुर मातर्जपन्मन्त्रवित् ।
तस्य क्षणिभुज भवन्ति वशगा लक्ष्मीश्चिरस्थायिनी
वाणी निर्मलसूक्तिभारभरिता जागर्ति दीर्घं वयः ॥ १६ ॥

कल्याणवृष्टिस्तवाच्या या शेवटच्या श्लोकात फलश्रुती वर्णन करतांना आचार्यश्री म्हणतात,

ह्रींकारत्रयसंपुटन- तीन ह्रींकार संपुटित.

कोणत्याही मंत्राच्या मागेपुढे एखादी गोष्ट लावले जाते तेव्हा त्याला संपुट असे म्हणतात. ह्रीं या बीजाक्षराच्या आधी ओंकार आणि नंतर श्री लावला जातो. अशा संपुटाने त्याला मंत्रत्व प्राप्त होते.

आई जगदंबाच निर्गुण-निराकार परब्रह्म आहे आणि तीच परमशक्ती आहे.हे सांगण्यासाठी आधी ओंकार आणि पुढे श्री लावला जातो. त्याचवेळी हे तिन्ही जणु काही एकच आहे ते सांगण्यासाठी ह्रींकारत्रय म्हटले.

महता मन्त्रण संदीपितं- ॐ ह्रीं श्रीं या महान मंत्राने संपादित असणारे, युक्त असणारे.

स्तोत्रं यः प्रतिवासरं तव पुर मातर्जपन्मन्त्रवित् - हे स्तोत्र, हे आई जगदंबे ! जो रोज तुझ्यासमोर मंत्राप्रमाणे जपतो.

त्याला मिळणारे दिव्यलाभ सांगताना आचार्यश्री म्हणतात,

तस्य क्षणिभुज भवन्ति वशगा- क्षोणी म्हणजे पृथ्वी तर भुज म्हणजे उपभोग घेणारा. अर्थात राजा. स्तोत्र वाचणाऱ्याला राजाही वश होतो. लक्ष्मीश्चिरस्थायिनी- स्थिर संपत्ती प्राप्त होते. संपत्ती इतरवेळा चंचल असते. पण आईचा कृपेने ती देखील स्थिर राहते. अर्थात लोकविलक्षण लाभ होतात.

वाणी निर्मलसूक्तिभारभरिता- सुंदर सुभाषितानि अलंकृत असलेली वाणी प्राप्त होते.

जागर्ति दीर्घं वयः- दीर्घकालिक आयुष्य प्राप्त होते.

जय जगदंब !